महाराष्ट्र शासन

क्र.संकीर्ण-२०११/प्र.क्र.७७/पंरा-२,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १७ जून, २०११

**संदर्भ:**- शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२००४/प्र.क्र.२५/१२, दिनांक २५ मे, २००६.

## कार्यालयीन आदेश

संदर्भाधीन शासन अधिसूचनेद्वारा महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्याचे विनियम आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ प्रस्तुत करण्यात आला आहे. सदर अधिनियमाच्या कलम १ (१) व (२) अंतर्गत प्रत्येक विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांनी त्यांना दुय्यम अधिकाऱ्यास अंतिम निर्णय घेण्यासाठी शक्ती प्रदान करावयाच्या आहेत. तसेच विभागाशी/कार्यालयाशी संबंधित सर्व बाबींवर अंतिम निर्णय घेण्याच्या दृष्टीने प्रकरणे सादर करणाऱ्या अधिकाऱ्यांचे तीन स्तर निर्धारित करण्याचे निदेश देण्यात आले आहेत. त्या अनुषंगाने या कार्यासनाशी संबंधित विषयांच्या बाबतीत सोबतच्या तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे स्तर निश्चित करण्यात येत आहेत. तथापि, वरिष्ठ अधिकाऱ्यांचे निर्देश असल्यास किंवा काही विशिष्ट अपवादात्मक प्रकरणी आवश्यकता भासल्यास प्रकरणपरत्वे त्यामध्ये योग्य तो बदल करण्यात येईल.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०११०६१७१२२२१२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

१७/६/११

(गजानन दा. लाभे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

सहपत्र- वरीलप्रमाणे

प्रति,

प्रधान सचिव (जलसंधारण) यांचे स्वीय सहायक,
सचिव (ग्रामविकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहायक,
ग्रामविकास व जलसंधारण विभागातील सर्व पर्यवेक्षकीय अधिकारी,
ग्राम विकास व जलसंधारण विभागातील सर्व कार्यासने,
निवडनस्ती/पंरा-२.

## विवरणपत्र

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ९ (१) व (२) अंतर्गत कार्यासनाशी संबंधित अंतिम निर्णय घेण्याच्या दृष्टीने प्रकरणे सादर करणाऱ्या अधिकाऱ्यांचे तीन स्तर निर्धारित करणे.

| अ.क्र. | विषय | स्तर | | | आदेश/प्रमाणपत्र/पत्र निर्गमित करण्यास सक्षम अधिकारी |
|---|---|---|---|---|---|
| | | प्रथम | द्वितीय | तृतीय | |
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) |
| १ | जिल्हा परिषदा व पंचायत समित्या निवडणूकासाठी मंत्रालय, जिल्हा व तालुका स्तरावर अतिरिक्त कर्मचारी वृंद निर्माण करण्यासंबंधीच्या, मतदानाच्या दिवशी सुट्टी व अर्थसंकल्पीय तरतूद, अनुदान वाटप करण्यासंबंधीच्या सर्व बाबी, लेखाशिर्ष २०५३०५२९, २०५३०५४७व २०५३१२०२. | अवर सचिव/ कक्ष अधिकारी | उप सचिव | सचिव (ग्रामविकास व पंचायतराज) | अवर सचिव/ कक्ष अधिकारी |
| २ | उच्च न्यायालय आणि जिल्हा न्यायाधीश यांच्याशी पत्रव्यवहाराच्या सर्व बाबींसह निवडणूक याचिकांविषयक सर्व बाबी. | अवर सचिव/ कक्ष अधिकारी | उप सचिव | सचिव (ग्रामविकास व पंचायतराज) | उप सचिव |
| ३ | महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या (महिलांसाठी फिरत्या क्रमाने जागा राखून ठेवण्याची पध्दत) नियम निश्चित करणे. | अवर सचिव/ कक्ष अधिकारी | उप सचिव | सचिव (ग्रामविकास व पंचायतराज) | उप सचिव |
| ४ | महाराष्ट्र जिल्हा परिषदा निवडणूक नियम, १९६२ व महाराष्ट्र पंचायत समित्या निवडणूक नियम, १९६२ ला सुधारणा करण्याबाबतच्या सर्व बाबी. | अवर सचिव/ कक्ष अधिकारी | उप सचिव | सचिव (ग्रामविकास व पंचायतराज) | उप सचिव |
| ५ | महाराष्ट्र जिल्हा परिषदा/पंचायत समित्या अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती (जागा राखून ठेवण्याची पध्दत) नियम त्यासंबंधीच्या सर्व बाबी. (पंचायत कायदा अनुसूचित क्षेत्रात लागू करणे इ.सह) | अवर सचिव/ कक्ष अधिकारी | उप सचिव | सचिव (ग्रामविकास व पंचायतराज) | उप सचिव |
| ६ | मुंबई ग्रामपंचायत अधिनियम व त्याखालील नियम यामधील सुधारणा व ग्रामपंचायत निवडणूक विषयक बाबी. | अवर सचिव/ कक्ष अधिकारी | उप सचिव | सचिव (ग्रामविकास व पंचायतराज) | उप सचिव |
| ७ | वरील विषयाशी संबंधित विधानमंडळाकडील प्रश्न, आश्वासने, न्यायालयीन प्रकरणे इत्यादी बाबी. | अवर सचिव/ कक्ष अधिकारी | उप सचिव | सचिव (ग्रामविकास व पंचायतराज) | अवर सचिव/ कक्ष अधिकारी |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ८ | राष्ट्रीय अनुसूचित जाती, जनजाती, सल्लागार समितीस आवश्यक माहिती. | अवर सचिव/ कक्ष अधिकारी | उप सचिव | सचिव (ग्रामविकास व पंचायतराज) | अवर सचिव/ कक्ष अधिकारी |
| ९ | गौण वनोपजाच्या खरेदी-विक्रीस मान्यता /मुदतवाढ इत्यादी. | अवर सचिव/ कक्ष अधिकारी | उप सचिव | सचिव (ग्रामविकास व पंचायतराज) | अवर सचिव/ कक्ष अधिकारी |
| १० | जिल्हा परिषद, पंचायत समित्यांचे अध्यक्ष/सभापतीच्या पदाचे आरक्षण. | अवर सचिव/ कक्ष अधिकारी | उप सचिव | सचिव (ग्रामविकास व पंचायतराज) | उप सचिव |
| ११ | ग्रामपंचायतीच्या सरपंच पदाचे आरक्षण. | अवर सचिव/ कक्ष अधिकारी | उप सचिव | सचिव (ग्रामविकास व पंचायतराज) | उप सचिव |
| १२ | पेसा ॲक्ट नुसार गौण वनोपजासंबंधी समितीस आवश्यक माहिती देणे. | अवर सचिव/ कक्ष अधिकारी | उप सचिव | सचिव (ग्रामविकास व पंचायतराज) | अवर सचिव/ कक्ष अधिकारी |
| १३ | जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियमामध्ये तसेच ग्रामपंचायत अधिनियमामध्ये नियुक्त समितीने केलेल्या शिफारशीवर कार्यवाही करणे. | अवर सचिव/ कक्ष अधिकारी | उप सचिव | सचिव (ग्रामविकास व पंचायतराज) | अवर सचिव/ कक्ष अधिकारी |
| १४ | न्याय पंचायत | अवर सचिव/ कक्ष अधिकारी | उप सचिव | सचिव (ग्रामविकास व पंचायतराज) | उप सचिव |